**सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय (अ. शा.), मुंबई यांना ई-फायलींग यंत्रणा सुरळीतपणे सुरु राहण्याकरिता आयपॅड खरेदी करण्याच्या रु.४४,८४,६००/- इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संप्रिसा- २०२४/प्र. क्र.१०/का. ७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २५ जून, २०२४.

**संदर्भ**:- १) सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय (अ. शा.), मुंबई यांचे पत्र क्र. आ.शा./१५५२/W.A., दिनांक ०८/०५/२०२४.
२) विभागाच्या दिनांक १३/०६/२०२४ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना** :-

सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय (अ. शा.), मुंबई यांनी ई-फायलींग यंत्रणा सुरळीतपणे सुरु राहण्याकरिता आयपॅड खरेदी करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. १ अन्वये शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास संदर्भ क्र. २ अन्वये विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १३/०६/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली. यानुषंगाने सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय (अ. शा.), मुंबई यांना ई-फायलींग यंत्रणा सुरळीतपणे सुरु राहण्याकरिता आयपॅड खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय (अ. शा.), मुंबई यांना ई-फायलींग यंत्रणा सुरळीतपणे सुरु राहण्याकरिता आयपॅड खरेदी करण्याच्या **रु.४४,८४,६००/-** (अक्षरी रुपये चव्वेचाळीस लक्ष चौऱ्याऐंशी हजार सहाशे फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. आयपॅड खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | संगणक सामग्री | नग | दर | एकूण रु. |
|---|---|---|---|---|
| १. | आयपॅड प्रो ११-इंच (४ जनरेशन) ५१२ जीबी स्टोरेज | १ | रु.१,११,९००/- | **रु.१,११,९००/-** |
| २. | आयपॅड एअर १२८ जीबी स्टोरेज | ७३ | रु.५९,९००/- | **रु.४३,७२,७००/-** |
| | | | **एकूण रु.** | **रु.४४,८४,६००/-** |

३. सदर आयपॅड वापरकर्त्यांना पुरवताना आयपॅड जबाबदारीने वापरण्याचे तसेच आयपॅड गहाळ झाल्यास तसेच वापरकर्त्यांना कोणत्याही कारणास्तव (प्रतिनियुक्ती, बदली, सेवासमाप्ती) कार्यमुक्त केल्यास आयपॅड जमा करण्याबाबत यांसारख्या त्याचप्रमाणे आयपॅडच्या अनुषंगाने सविस्तर सूचना अटी/शर्ती सरकारी वकील, कार्यालय यांच्यामार्फत निर्गमित करण्यात याव्यात.

४. सदर संगणक सामग्री खरेदी ही उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार GeM पोर्टलवरुन शासनाच्या विहित पध्दतीने करण्यात यावी.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधि व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६२६१२१५३९५८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHISH ARVINDRAO AYACHIT

Digitally signed by ASHISH ARVINDRAO AYACHIT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=3d6a5e330b3b57f01daab1dbb0968a1823ebae88f93a4b8312e0276db894e483, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7192473332944CE7C0ACBF0C66959B3BC3088FE6AC83A09BD02BC394AED7EA8D, cn=ASHISH ARVINDRAO AYACHIT
Date: 2024.06.26 12:26:33 +05'30'

**( आशिष अयाचित )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय (अ. शा.), जुनी सा. बां. वि. इमारत, पहिला मजला, फोर्ट, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला एपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ, चर्चगेट, मुंबई-२०.
९. संचालक, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
१०. कार्यासन अधिकारी, कार्यासन-१३, २३ व २४ विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. निवड नस्ती/का. ७.